**राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियांनातर्गत महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांना ८ मे.टन प्रकल्पाचे २० मे.टन दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्पात विस्तारीकरणासाठीच्या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी व निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१२ /प्र.क्र.७४ /पदुम-८

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीख: ३० जुलै, २०१४

वाचा : १. कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही- ०५१४/सी.आर.२६/आरकेव्हीवाय सेल, दि.१८.७.२०१४ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

२. केंद्र शासनाच्या कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. १-१/२०१२-डीपी, दिनांक १५.५.२०१४

**प्रस्तावना :**

केंद्र शासनामार्फत पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय व मस्त्यव्यवसाय या उपविभागांतर्गत "राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण " हा कार्यक्रम देशात राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत विशेष योजनेखाली राबविण्यात येत असलेल्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान या कार्यक्रमाखाली दिनांक ५.७.२०१४ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत विहित कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांचा ८ मे.टन प्रकल्पाचे २० मे.टन दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्पाच्या विस्तारीकरणासाठीचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. उपरोक्त प्रस्तावास संदर्भ क्रमांक १ अन्वये राज्यस्तरीय प्रकल्प समितीने संदर्भ क्रमांक २ येथील केंद्र शासनाने NPBBDD या कार्यक्रमासाठी निश्चित केलेल्या निधी संरचनेच्या समांतर अर्थसहाय्यावर राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण हिस्सा ५० टक्के व लाभार्थी हिस्सा ५० टक्के या तत्वावर राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान या कार्यक्रमाखाली महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांचा प्रकल्प राबविण्यास मान्यता दिली आहे. उपरोक्तप्रमाणे मान्यता मिळाल्यानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांचा ८ मे.टन प्रकल्पाचे २० मे.टन दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्पाच्या विस्तारीकरणासाठीच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या विशेष योजनेंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण कार्यक्रमाखाली महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांचा ८ मे.टन प्रकल्पाचे २० मे.टन दुग्धपदार्थ निर्मिती विस्तारीकरणाचा प्रकल्प शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देत आहे.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प किंमत | राकृवियो हिस्सा (५०%) | लाभार्थी हिस्सा (५०%) | सन २०१४-१५ मध्ये संघास प्रथम हप्त्यापोटी वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म.,मुंबई यांचा ८ मे.टन प्रकल्पाचे २० मे.टन दुग्धपदार्थ निर्मिती विस्तारीकरणाचा प्रकल्प | १६,००,००,००० | ८,००,००,००० | ८,००,००,००० | १,६५,००,००० |

सदर प्रकल्पाचा कालावधी २ वर्षाकरीता राहील. सदर प्रकल्प राबविण्याकरीता मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठी प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबतचे विहित नमुन्यातील बंधपत्र व कामांचा आराखडा आयुक्त, दुग्धव्यवसाय यांना सादर करणे बंधनकारक आहे. आयुक्त , दुग्धव्यवसाय यांनी उपरोक्त संघाकडून विधिग्राहय बंधपत्राचा नमुना निश्चित करुन त्यानुसार संघाकडून बंधपत्र लिहून घ्यावे व ते शासनास सादर करावे. मंजूर करण्यात आलेला निधी सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या मंजूर घटकांकरीता संघाने खर्ची घालावा.

<u>अटी व शर्ती -</u>

१. मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा प्रकल्पावर होणारा अधिकचा खर्च संघ स्वत: सोसेल. वाढीव प्रकल्पावर होणाऱ्या खर्चासाठी शासन जबाबदार राहणार नाही. तसेच त्याकरीता शासनामार्फत मंजूर प्रकल्प किंमती व्यतिरिक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही.

२. राज्यातील दूध कमतरता/अतिरिक्त दूध उत्पादन काळात राज्य शासनाचा निर्णय संघावर बंधनकारक राहील.

३. मंजूर करण्यात आलेल्या निधी बाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे महासंघाने ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरिक्षण या संबंधीची माहिती आयुक्त दुग्धव्यवसाय यांना सादर करावी.

४. महासंघाला मंजूर निधीमधून प्राप्त झालेल्या मिळकतीचे (स्थावर /निमस्थावर) लेखे लेखापरिक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावेत.

५. महासंघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीतील वाढीची विल्हेवाट लावण्यापूर्वी त्यास शासनाची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

६. महासंघास उपलब्ध करुन दिलेल्या निधी उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेमार्फत शासनास सादर करावे. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज उर्वरित निधी वितरीत केला जाणार नाही.

७. मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी महासंघाची राहील.

८. शासन निधी वितरीत होईल त्या प्रमाणात महासंघ आपला हिस्सा गुंतविणे बंधनकारक आहे. सदर प्रकल्प राबविणे सोयीचे व्हावे त्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास व महासंघाचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. प्रकल्प योग्यरित्या पूर्ण व्हावा त्यासाठी आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी आढावा घ्यावा.

९. या योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास सदर निधी शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व तरतूदीनुसार व्याजासहीत महासंघाकडून वसूल करण्यात येईल.

१०. सदर योजने अंतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहीत्य व उभारण्यात येणा-या प्रकल्पासाठी महासंघाने निविदा प्रक्रीयेचा अवलंब करावा.

११.या योजने अंतर्गत बसविण्यात येणा-या साहीत्यांवर तसेच योजने अंतर्गत उभारण्यात येणा-या दुग्धशाळा व दूध प्रक्रीया प्रकल्पावर हा प्रकल्प "राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत प्रकल्प " असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१३३८५६१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe
Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.08.02 10:48:49 +05'30'

(श.मा.साठे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (कृषि )यांचे खाजगी सचिव
४. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
६. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
९. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई
१२. सहनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध), मुंबई विभाग, मुंबई
१३. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१४. कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१५.निवड नस्ती

## शासन निर्णय क्र.राकृवि २०१२/प्र.क्र.७४/पदुम ८,दि.३०.७.२०१४ चे परिशिष्ट अ

कार्यक्रमाचे नाव - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान

प्रकल्पाचे नाव- **महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., मुंबई**

प्रकल्पातील मुख्य घटक- 8 मे.टन दुग्धजन्य पदार्थ निर्मिती प्रकल्पाचे 20 मे.टन प्रकल्पात विस्तारीकरण

(रुपयांत)

| अनुक्रमांक | मंजूर घटक | प्रकल्प किंमत | राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत मंजूर निधी (50%) | संघ हिस्सा(50%) |
|---|---|---|---|---|
| 1 | प्रकल्प इमारत बांधका | 62,500,000 | 31,250,000 | 31,250,000 |
| 2 | सयंत्र, यंत्रसामुग्री व सनियंत्रण खर्च | 90,000,000 | 45,000,000 | 45,000,000 |
| 3 | प्रकल्प सल्लागार व संनियंत्रण | 7,500,000 | 3,750,000 | 3,750,000 |
| | **एकूण** | **160,000,000** | **80,000,000** | **80,000,000** |